भारतीय वन सेवेतील संवर्ग पुनर्विलोकनाच्या अनुषंगाने श्रेणीवाढ/श्रेणी अवनत तसेच पदनामांमध्ये बदल झालेल्या पदांबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः एएफओ-१०१३/प्र.क्र.-२४१/फ-७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई
दिनांक: १६ मार्च, २०१७.

**वाचा -**

१. भारत सरकार, कार्मिक, लोक शिकायत तथा पेन्शन मंत्रालय, नवी दिल्ली यांची अधिसूचना क्रमांक:१६०१६/०१/२०१६-एआयएस-II(ए), दिनांक १२ ऑगस्ट, २०१६.
२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक एएफओ-१०१३/प्र.क्र.-२४१/फ-७, दिनांक १५ ऑक्टोबर, २०१६.
३. मुख्य वनसंरक्षक, कार्य आयोजना (पश्चिम), पुणे यांचे पत्र क्रमांक-कक्ष-३/आस्था/अ.३७५/२०१६-१७, दिनांक ६ मार्च, २०१७.

**शासन निर्णय -**

भारतीय वन सेवा (संवर्ग) नियम, १९६६ च्या नियम क्रमांक ४ (२) अन्वये भारतीय वन सेवा (संवर्ग पद संख्या विनियमन) विनियम १९६६ मध्ये संदर्भाधीन अधिसूचनेन्वये भारतीय वन सेवेतील राज्यात कार्यरत असलेली काही पदे श्रेणी उन्नत/श्रेणी अवनत तसेच काही पदांच्या पदनामात बदल केलेला आहे. त्यानुषंगाने, पदनामांमध्ये झालेल्या बदलांचा तपशिल सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणण्यासाठी संदर्भ क्रमांक २ येथिल शासन निर्णय निर्गमित करण्यात आला होता. संदर्भ क्रमांक १ येथिल अधिसूचनेन्वये अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, कार्य आयोजना (पश्चिम), पुणे हे पद देखिल मुख्य वनसंरक्षक या श्रेणीत अवनत केले होते. तथापि, सदर पदावर कार्यरत असलेले अधिकारी हे दिनांक ३० नोव्हेंबर, २०१६ रोजी नियत वयमानानुसार सेवा निवृत्त होणार असल्याने संदर्भ क्रमांक २ येथिल शासन निर्णयात याबाबतचा उल्लेख करण्यात आला नव्हता. प्रस्तुत अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, कार्य आयोजना (पश्चिम), पुणे हे पद मुख्य वनसंरक्षक, कार्य आयोजना (पश्चिम), पुणे असे श्रेणी अवनत करण्यात आलेले आहे.

सदर प्रमाणे श्रेणी अवनत केल्यामुळे झालेल्या पदनाम बदलाच्या अनुषंगाने महालेखापाल कार्यालय व संचालक, लेखा व कोषागार कार्यालय, मुंबई यांच्याशी आहरण व संवितरण अधिकाऱ्याच्या सांकेतांक क्रमांकाबाबत संबंधित कार्यालय प्रमुखाने पत्रव्यवहार करावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१६१२२६१९८३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Suryakant Hanje

Digitally signed by Sunil Suryakant Hanje
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Dept, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b52de42797ba0b88d4615daa9566ad8fa49d50637950208576d69ab9dba313a9, cn=Sunil Suryakant Hanje
Date: 2017.03.16 12:27:31 +05'30'

**( सुनिल हंजे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.मुख्य सचिव यांचे उपसचिव, महाराष्ट्र शासन मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. सचिव (वने) यांचे स्विय सहायक.
९. मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय) यांचे स्विय सहायक.
१०.प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख) महाराष्ट्र राज्य,नागपूर.
११.प्रधान मुख्य वनसंरक्षक (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१२.अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक) महाराष्ट्र राज्य, नागपूर.
१३.वनसंरक्षक (कार्य आयोजना), नाशिक/औरंगाबाद/डहाणू (नवी मुंबई स्थित)
१४.उप वनसंरक्षक (कार्य आयोजना), पुणे/कोल्हापूर/धुळे/.
१५.संचालक, लेखा व कोषागार कार्यालय, मुंबई
१६.महालेखापाल १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१७.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१८.सहायक संचालक, भा.व.से. (लेखा), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९.निवड नस्ती (फ-७)